**केंद्र पुरस्कृत योजना सन २०१६-१७**
**"वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रम" योजनांतर्गत २४ राष्ट्रीय उद्याने / अभयारण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०८.१६/प्र.क्र.२९९/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०२ नोव्हेंबर, २०१६.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक :- अर्थसं-२०१५/प्र.क्र.११२/अर्थ-३, दिनांक ०६.०६.२०१५.
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूएलपी-०६.१५/प्र.क्र.१९०/फ-१, दिनांक :- ०६.०८.२०१६
३. केंद्रीय पर्यावरण व हवामान बदल, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक २०१५/१३-११३-१३/२०१६ डब्ल्यूएल/७९, दिनांक :- ०८.०९.२०१६.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/ सी/यो/प्र.क्र.०६/१२५७/१६-१७, दिनांक :- २९.०९.२०१६.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूएलपी-०८.१५/प्र.क्र.२९९/फ-१, दिनांक :- १८.१०.२०१६.

**प्रस्तावना :-**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना- "वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रमा" अंतर्गत २४ राष्ट्रीय उद्याने / अभयारण्याचे विकासाकरिता केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये रु. ७५३.११९ लक्षचे (सर्वसाधारण घटक रु. ७१५. ९८८ लक्ष व विशेष घटक अजा. रु. ३७.१३१ लक्ष) कार्यबाबींस केंद्र शासनाने मंजूरी प्रदान केलेली आहे. केंद्र शासनाने अनावर्ती व आवर्ती विशेष घटकासाठी (अजा) रु. ३७.१३१ लक्षच्या कार्यबाबींना मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने केंद्र शासनाचा ६० % हिस्सा रु. २२.२८ लक्ष वहन करुन पहिला हप्ता रु. १७.८२ लक्ष मुक्त करणे अपेक्षित होते. तथापि केंद्र शासनाने ६०% हिस्सा अंतर्गत अनावर्ती व अनावर्ती (सर्वसाधारण घटक) कार्यबाबींकरीता रु. ३२४.३६९ लक्ष व अनावर्ती व अनावर्ती (विशेष घटक {अजा/अज}) कार्यबाबींकरीता रु. ३७.१३१ लक्ष असे एकूण रु. ३६१.५० लक्ष प्रथम हप्ता वितरीत केला आहे. त्यापैकी संदर्भ क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये उपरोक्त योजनांतर्गत रु. अनावर्ती व अनावर्ती (विशेष घटक{अजा/अज})कार्यबाबींकरीता रु. ३७.१३१ लक्ष वगळून उर्वरित रु. ३२४.३६९ लक्ष व राज्य हिस्सा रु. २१६.२४६ लक्ष असे रु. ५४०.६१५ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

सदर योजनेच्या विशेष घटकाच्या (अजा) केंद्र व राज्य हिश्यासाठी (२४०६ A१६७) व (२४०६ A १७६) ही लेखाशीर्षे मंजूर करण्यात आली आहेत. तथापि सदर लेखाशीर्षात नियतव्ययाची तरतूद करण्यात आलेली नाही. त्यामुळे सदर घटकासाठी अनुदान वितरणाचा शासन निर्णय वेगळ्याने निर्गमित करण्यात येईल असे संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयात नमूद करण्यात आले आहे. तथापि सदर प्रक्रियेस काही कालावधी लागणार आहे आणि तोपर्यंत सदरचा निधी अखर्चित राहू नये म्हणून सदर निधी आवश्यक आहे.

## शासन निर्णय

सबब आता सदर शासन निर्णयान्वये संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावातील कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटीवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

प्रस्तावित खर्चापैकी I) अनावर्ती व आवर्ती सर्वसाधारण घटक कार्यबाबींसाठी रु. ३७.१३१ लक्ष ५० % केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत विकासात्मक कामांसाठीचा खर्च लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(०३) वन्यजीवन व्यवस्थापन आणि संरक्षण (५० % केंद्रीय अनुदान) (२४०६ ०७८४) च्या सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

अ) मान्यता दिलेल्या खर्चाच्या तपशीलवार बाबी केंद्र शासनाने उपरोक्त संदर्भीय पत्रांमध्ये नमूद केल्या आहेत. सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

आ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

इ) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. करुन खरेदी करण्यात यावी.

ई) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व दिनांक २०.०४.२०१६ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

उ) सदर शासन निर्णयान्वये अनावर्ती व आवर्ती विशेष घटक {अजा/अज} कार्यबाबींसाठी वितरीत करण्यात आलेला रु. ३७.१३१ लक्ष निधी २४०६ ०७८४ ह्या लेखाशीर्षाखाली

खर्च करुन सदर खर्चाचा ताळमेळ (reconciliation) करुन झालेला खर्च २४०६ A१६७ ह्या लेखाशीर्षाखाली अनुदान उपलब्ध झाल्यावर वर्ग करण्याची कार्यवाही करावी.

ऊ) प्रस्तुत प्रकरणी केंद्र शासनाचा हिस्सा व राज्य शासनाचा हिस्सा मधील अंतर्भूत १० % **Flexi Fund बाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी**.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११०२१६२२५०७०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, serialNumber=2972090f5c611c22111cacebf1c55ba326016fa7107614a6b256203dbb7235cd, cn=Arvind Shankar Apte
Date: 2016.11.02 16:24:16 +05'30'

**( अरविंद आपटे )**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
६. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयतस) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).